**<u>पदस्थापना</u>**
**श्रीम. चारूशीला वि. चव्हाण**
**उप अभियंता (स्थापत्य)**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन आदेश क्रमांकः एलटीएस- २०२१/प्र.क्र. २३५ (२) /सेवा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: १०/०५/२०२२

## शासन आदेश

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन व शासकीय कर्तव्य पार पाडताना होण्याऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार व सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने, प्रशासकीय कारणास्तव पदस्थापनेविना असलेल्या श्रीम.चारुशिला विलास चव्हाण यांची पदस्थापना अधीक्षक अभियंता, प्रधानमंत्री ग्रामसडक योजना, पुणे यांच्या कार्यालयातील उप अभियंता (स्थापत्य) या पदावर करण्यात येत आहे.

२. संबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी श्रीमती चव्हाण, उप अभियंता यांना नवीन नेमणूकीच्या ठिकाणी तात्काळ रुजू होण्यास सांगावे.

३. श्रीमती चव्हाण, उप अभियंता यांनी नवीन पदाचा कार्यभार त्वरीत स्वीकारावा, त्यांनी अनधिकृतरित्या गैरहजर राहू नये अन्यथा त्यांची अनुपस्थिती अनधिकृत गैरहजेरी म्हणून समजण्यात येईल व विनावेतन करण्यात येईल, तसेच त्यांच्या सेवेत खंड पडण्याची शक्यता देखील नाकारता येत नाही. याची जाणीव सबंधितांना करुन देण्यात येत आहे. तसेच, त्यांचे लक्ष शासन परिपत्रक,सामान्य प्रशासन विभाग क्र.सीडीआर-१०८२/ २५६७/ २८/ अकरा, दिनांक ३०.८.१९८२ कडे वेधण्यात येत आहे. सदर परिपत्रकान्वये दिलेल्या सूचना लक्षात घेता, त्यांनी बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगविषयक कारवाईस पात्र ठरतील, याचीही नोंद घ्यावी.

४. संबंधित नियंत्रण अधिका-यांना कळविण्यात येते की, त्यांनी श्रीमती चव्हाण यांचा पदभार स्विकारल्याचा दिनांक त्वरीत शासनास कळवावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०५१०१५५२११७९१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PATIL SWATI SACHIN

Digitally signed by PATIL SWATI SACHIN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT,
2.5.4.20=a08a4a756cd7e1e1ea2a6f91922d10f103cebd44790093322544672eefd3784b, postalCode=400032,
st=Maharashtra,
serialNumber=41A9218232BBAEA65861213D86D108EA7C48905DA5F33DBA9C8F6662CB8F9E18, cn=PATIL SWATI SACHIN
Date: 2022.05.10 17:40:36 +05'30'

**( स्वा. स. पाटील )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल-१ ( लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य , मुंबई.
२. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे
३. मुख्य अभियंता, प्रधानमंत्री ग्रामसडक योजना, पुणे
४. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
५. अधीक्षक अभियंता, सा.बां. मंडळ, पुणे
६. सह सचिव, ग्राम विकास विभाग, मर्झबान रोड, बांधकाम भवन, मुंबई
७. श्रीम.चारुशिला चव्हाण, उप अभियंता यांना मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांच्यामार्फत.
८. खाजगी सचिव,मा.मंत्री (सा.बां.) (सार्वजनिक उपक्रम वगळून) /मा.मंत्री, सा.बां. (सार्वजनिक उपक्रम)/ मा.राज्यमंत्री (सा.बां.) (सार्वजनिक उपक्रम वगळून)/मा. राज्यमंत्री (सा.बां.), (सार्वजनिक उपक्रम), मंत्रालय, मुंबई.
९. अपर मुख्य सचिव (सा.बां.)/सचिव (रस्ते/ बांधकामे) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय मुंबई.
१०.निवडनस्ती, सार्वजनिक बांधकाम विभाग, सेवा-२.